आकस्मिकता निधीमधील आगाऊ रकमामधून
करावयाच्या खर्चाच्या कार्यपध्दतीबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्र. सीएनएफ-१०८६/१५३/अर्थसंकल्प-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: २८ ऑगस्ट १९८६.

परिपत्रक

पहा:- १] शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. बीजीटी-१०७६/७४/बीयुडी-५, दि. ६ फेब्रुवारी, १९७६.
२] शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. सीएनएफ-१०७६/४०८/बीयुडी-१४, दि. २९ सप्टेंबर, १९७६.
३] शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. सीएनएफ-१०७९/१५५/बीयुडी-५, दि. १९ फेब्रुवारी १९७९.
४] शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. सीएनएफ-१०८३/१४०/बीयुडी-३, दि. २६ एप्रिल १९८३.

परिपत्रक

आकस्मिकता निधी नियम ६ अन्वये, आकस्मिकता निधीमधून घेतलेल्या आगाऊ रकमातून खर्च करण्यासाठी जी देयके सादर करावयाची असतात, त्या देयकांच्या वरील बाजूस "आकस्मिकता निधी" असे लाल शाईमध्ये ठळकपणे लिहावयाचे असते. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. सीएनएफ-१०८३/१४०/बीयुडी-३, दि. २६.४.१९८३ च्या ४[२] मध्ये ज्या शासन ज्ञापनान्वये आकस्मिकता निधीमधून आगाऊ रक्कम मंजूर केलेली असते, त्याचा क्रमांक व दिनांक लाल शाईमध्ये देयकांवर लिहावा अशा सूचना दिल्या आहेत. तथापि, आकस्मिकता निधी नियम ६ व वरील सूचनांचे संबंधीत अधिकाऱ्यांकडून पालन होत नाही व परिणामत: अपेक्षित खर्च आगाऊ रकमेमधून न केला जाता तो खर्च एकत्रित निधीमध्ये संबंधीत लेखा शीर्षाखालील मंजूर अनुदानातील खर्च म्हणून शासकीय लेख्यांमध्ये दाखविला जातो. याचा परिणाम आकस्मिकता निधीमधून घेतलेली रक्कम एकतर पूर्णपणे न वापरली जाता ती तशीच राहते अथवा फारच अल्प प्रमाणांत त्या रकमेतून खर्च होतो. ही वित्तीय अनियमित-तेची एक गंभीर बाब असून लोक लेखा समितीने ही अनियमितता टाळण्यासाठी कांही उपाययोजना करावी अशी सूचना वित्त विभागास केली होती.

२. वरील वित्तीय अनियमितता टाळावी म्हणून अनेक पर्यायी योजनांचा शासनाचे विचार केला. ज्या ज्या वेळी अग्रीम मंजूर केला जाईल त्या त्या वेळी देयके सादर करण्याच्या पध्दतीची माहिती विभाग प्रमुख/नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांना दिल्यास या अनियमिततेस आळा बसेल अशा

[कृ. मा. प.]

निर्णयाप्रत शासन आले असून त्या बाबत खालील पध्दतीचा अवलंब करावा असे शासनाने ठरविले आहे:-

१] आकस्मिकता निधीमधून आगाऊ रक्कम घेतल्यानंतर मंत्रालयीन विभाग या रकमेच्या वापराबद्दल जे आदेश काढतील त्या आदेशात खालील प्रमाणे परिच्छेद न चुकता अंतर्भूत करण्यात यावा :-

"------------------------------------------------------------------------------------------[नियंत्रक अधिकारी/विभाग प्रमुख, ज्यांच्याकडे आगाऊ रक्कम खर्चासाठी सुपूर्त करावयाची आहे त्यांचा हुद्दा] यांनी, आकस्मिकता निधीमधून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे रक्कम सुपूर्त करण्यासंबंधीच्या आदेशात/पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणाऱ्या देयकावर आकस्मिकता निधी अग्रिम--शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक: दिनांक अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे अशी स्पष्ट सूचना त्या आदेशात/पत्रात अंतर्भूत करावी व ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावी."

३. मंत्रालयीन विभागांनी वरील परिच्छेद-२ मधील सूचनांचे तंतोतंत पालन करावे व नियंत्रक अधिकारी/विभाग प्रमुख हे आगाऊ रकमेच्या वापरासाठी मंत्रालयीन विभागानी पाठविलेल्या आदेशात दिलेल्या सूचनांचे पालन करतील याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.सीएनएफ-१०८३/१५०/अर्थसंकल्प-3, दि. २६.४.१९८३ मध्ये मंत्रालयाचे प्रशासकीय विभाग, नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांच्या, आकस्मिकता निधीमधून मंजूर करून घेतलेल्या आगाऊ रकमाबाबत जबाबदाऱ्या दर्शविल्या आहेत. त्या जबाबदाऱ्यांचे योग्य त्या तऱ्हेने पालन केले जाईल याची दक्षता मंत्रालयीन विभागांनी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
[म. सी. पाध्ये]
उप सचिव, वित्त विभाग.

१] सर्व मंत्रालयीन विभाग,
२] संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३] इतर सर्व विभाग प्रमुख,
४] सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
५] प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
६] प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,
७] सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
८] सर्व कोषागार अधिकारी,
९] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.